मुंबई करमणूक शुल्क (सुधारणा) अधिनियम, २०११
(सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१३)
च्या अंमलबजावणीबाबतचे प्रशासकीय आदेश

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्र.ईएनटी १००६/प्र.क्र.२२२(भाग-१)/टी-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ जून, २०११

**वाचा :-** मुंबई करमणूक शुल्क (सुधारणा) अधिनियम २०११ (सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१३), दिनांक २१ एप्रिल, २०११

मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मधील कलम ३ १(ब) अनुसार करमणूकीच्या निरनिराळ्या साधनांवर विविध क्षेत्राकरिता करमणूक शुल्क विहित दराने आकारण्यात येत होते.

**सुधारणेपूर्वी ३(१) (ब) नुसार करमणूक शुल्क आकारणीचा दर**

| अ.क्र. | क्षेत्र | **तिकीटाच्या मुल्यांपैकी देय असलेली करमणूक शुल्काची रक्कम** |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | बृहन्मुंबई महानगर पालिका | २५ % |
| २ | राज्यातील सर्व महानगर पालिका (बृहन्मुंबई महानगर पालिका व कटक क्षेत्रे वगळून) | २०% |
| ३ | "अ","ब" व "क" वर्ग नगरपरिषदा वरील अ.क्र. १ व २ मध्ये नमूद केलेल्या क्षेत्रांव्यतिरिक्त अन्य क्षेत्रे | १५% |
| ४ | वरील अ.क्र. १ ते ३ मध्ये नमूद केलेल्या क्षेत्रांव्यतिरिक्त अन्य क्षेत्रे | शुल्क नाही. |

अधिनियमातील कलम ३ (१) (ब) नुसार करमणूकीच्या ठिकाणी प्रवेशाकरिता आकारण्यात येणा-या प्रवेशशुल्काच्या एकूण मूल्यावर करमणूक शुल्क लागू करण्याची तरतूद असून अधिनियमातील कलम ३ (१) (क) नुसार प्रवेश मिळण्यासाठी मालकाने निश्चित केलेल्या प्रवेशमूल्यावर करमणूक शुल्क लागू करण्यांत येतो. यामुळे होणारी विसंगती दूर करुन अधिनियमात सुसूत्रता आणण्याकरिता, प्रवेशाकरिता मालकाने निश्चित केलेल्या प्रवेशशुल्कावर करमणूक शुल्क लागू करण्याकरिता कलम ३ (१) (ब) मध्ये सुधारणा करण्यात येत आहे.

यानुसार मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मधील कलम ३ १(ब) नुसार करमणूकीच्या विविध साधनावर पुढील दराने करमणूक शुल्क आकारणी करण्यांत येईल.

सुधारणेनंतर अधिनियमातील कलम ३ (१) (ब) प्रमाणे करमणूक शुल्क आकारणीचा दर

| अ.क्र. | क्षेत्र | तिकीटाच्या मुल्यांपैकी देय असलेली करमणूक शुल्काची रक्कम |
|---|---|---|
| | | ३ |
| १ | २ | २५ % |
| १ | बृहन्मुंबई महानगर पालिका | २०% |
| २ | राज्यातील सर्व महानगर पालिका (बृहन्मुंबई महानगर पालिका व कटक क्षेत्रे वगळून) | १५% |
| ३ | "अ","ब" व "क" वर्ग नगरपरिषदा वरील अ.क्र. १ व २ मध्ये नमूद केलेल्या क्षेत्रांव्यतिरिक्त अन्य क्षेत्रे | १०% |
| ४ | वरील अ.क्र. १ ते ३ मध्ये नमूद केलेल्या क्षेत्रांव्यतिरिक्त अन्य क्षेत्रे | |

या अनुषंगाने मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मध्ये सुधारणा करण्यांत आल्या आहेत. या तरतूदीनुसार आवश्यक कार्यवाही करुन सुधारीत दराने करमणूक शुल्क आकारणी करण्याची दक्षता घेण्यांत यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर निर्णय या संदर्भातील अध्यादेश प्रसिध्द झाल्याच्या दिनांक १५ जानेवारी, २०११ पासून अंमलात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक 201106171746450001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

विद्या हम्पय्या

(विद्या हम्पय्या )
अवर सचिव
महसूल व वन विभाग

सोबत:- दिनांक २१ एप्रिल,२०११ च्या
अधिसूचनेच्या प्रती

प्रत तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी

प्रत माहितीकरिता अग्रेषित :-

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
५. प्रधान सचिव (विधी विधान), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
६. निवडनस्ती, टी-१ कार्यासन, महसूल व वन विभाग.

F:\VIDYA T-1/financial memorandum 3 (1) (b .)wn/8